मुंबई व सभोवताली जलप्रवासी वाहतूक
सुरु करण्याचे प्रकल्पाचे कार्यवाही
उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक,
महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ
यांना (Nodal Officer ) समन्वय
अधिकारी म्हणून नियुक्त करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक आयडब्ल्यूटी २०९८/सीआर ३१/पीआरटी-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २९ ऑक्टोबर २००२

शासन निर्णय, गृह विभाग, क्र.आयडब्ल्यूटी २०९८/सीआर ३१/परि-४,
दिनांक १४ जुलै, १९९८
शासन निर्णय, गृह विभाग क्र. .आयडब्ल्यूटी २०९८/सीआर ३१/परि-४,
दिनांक १८ फेब्रुवारी, १९९९
शासन निर्णय, गृह विभाग क्र. .आयडब्ल्यूटी २०९८/सीआर ३१/पीआरटी-१,
दिनांक १४ जून , १९९९
शासन निर्णय, गृह विभाग क्र. .आयडब्ल्यूटी २०९८/सीआर ३१/पीआरटी-१,
दिनांक १५ फेब्रुवारी, २००२
शासन निर्णय, गृह विभाग. क्र.जेईटी ०५/२००२/प्र.क्र.३२/बंदरे-२,
दिनांक २४ एप्रिल, २००२

शासन निर्णय दि.१४ जून, १९९९ व शासन निर्णय दिनांक १५ फेब्रुवारी, २००२ अन्वये मुंबई व मुंबई उपनगरे शहराच्या सभोवताली जलप्रवासी वाहतूक प्रकल्पाची उभारणी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांचेमार्फत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. तसेच दक्षिण मुंबईमध्ये जलप्रवासी वाहतूकीकरिता प्रवासी धक्का कुठे उभारण्यात यावा याबाबत मे.होव (इंडिया) प्रा. लि. यांनी भाऊचा धक्का व रेडियो क्लब, कुलाबा या दोन ठिकाणांची शिफारस केली आहे. यासंदर्भात दिनांक १२ जुलै, २००२ रोजी मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली बैठक घेण्यात आली. त्यामध्ये जलप्रवासी धक्का उभारणीकरिता महाराष्ट्र महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य औद्योगिक विकास महामंडळ, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड,मुंबई व महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांचा आर्थिक सहभाग अनुक्रमे ४० : २० : २० : २० या प्रमाणात ठेवून या प्रयोजनासाठी एक

Special Purpose Vehicle निर्माण करुन प्रकल्पाची उभारणी करण्याबाबत निर्णय झाला आहे.

**शासन निर्णय :-** शासनाचे शक्तीप्रदान समितीचे दि.१ एप्रिल, २००२ व दिनांक १२ जुलै, २००२ चे बैठकीतील निर्णयाप्रमाणे शासन उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ यांना प्रस्तावनेत नमूद केलेल्या दोन्ही प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी समन्वय अधिकारी म्हणून नियुक्त करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

सुभाष बांगवे

**( सुभाष बांगवे )**

**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१ )महापालिका आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई

२ )चेअरमन, मुंबई पोर्ट ट्रस्ट, मुंबई

३ )प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

४ )प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

५ )प्रधान सचिव, नियोजन विभाग , मंत्रालय, मुंबई

६ )प्रधान सचिव(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

७ )महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई-५१

८ )व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ लि., मुंबई-३६

९ )प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

१०)व्यवस्थापकीय संचालक, सिडको, मुंबई

११)मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई

१२)सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई

१३)व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम, मुंबई

१४ )मुख्य कार्यकारी संचालक, माझगाव डॉक लि. मुंबई

१५ )जिल्हाधिकारी, मुंबई शहर, मुंबई

१६)जिल्हाधिकारी, उपनगर जिल्हा, मुंबई

१७)श्री.पाटणकर, मुख्य अभियंता, मे.होव इंडिया लि., नवी दिल्ली.